**महाराष्ट्र पाटबंधारे अधिनियम १९७६ कायद्यामध्ये सुधारणा व कायद्याचे नियम (Rules) करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण १०११/(३४१/११)/२०११/सिंव्य(धोरण)**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: ०५ डिसेंबर, २०१४.

<u>प्रस्तावना</u>

महाराष्ट्र राज्याची निर्मीती १९६० साली झाली त्यावेळी पाटबंधारेशी संबंधीत खालील कायदे अस्तित्वात होते.

१) मुंबई पाटबंधारे अधिनियम, १८७९
२) मध्यप्रांत पाटबंधारे अधिनियम १९३१
३) मध्यप्रांत व वऱ्हाड पाण्याचे नियम करण्याबाबत अधिनियम, १९४९
४) हैद्राबाद पाटबंधारे अधिनियम, १९५७ - फसली , आणि
५) हैद्राबाद पाटबंधारे (सुधारणा अंशदान आणि अंतर्भाव फी) अधिनियम, १९५२

या सर्व कायद्यामधील संबंधीत व आवश्यक तरतूदींचे एकत्रिकरण करुन व तत्कालीन सिंचन पध्दतींचा विचार करुन महाराष्ट्र पाटबंधारे अधिनियम,१९७६ हा कायदा पारीत करण्यात आला. या कायद्यानुसार तद्नंतर पाटबंधारेशी संबंधीत सर्व कामकाज करण्यात येत आहे. त्यानंतर जुलै, २००३ रोजी जलसंपदा विभागाने राज्याची जलनीती घोषित केली. राज्यातील उपलब्ध जलसंपत्तीचे पाण्याच्या हक्कदारीचे समन्यायी वाटप करण्यासाठी महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण कायदा २००५ मध्ये पारित करण्यात आला. तसेच राज्यातील जलसंपदा प्रकल्पांचे व्यवस्थापनात शेतकऱ्यांचा सक्रीय सहभाग घेण्यासाठी महाराष्ट्र सिंचन पध्दतीचे शेतकऱ्यांकडून व्यवथापन अधिनियम, २००५ मध्ये करण्यात आला. या पार्श्वभूमीवर व राज्यामध्ये इतर अनुषंगिक कायदे / नियम यातील तरतुदींचा समन्वय साधण्यासाठी महाराष्ट्र पाटबंधारे अधिनियम, १९७६ मध्ये सुधारणा करणे शासनाच्या विचाराधीन होते. तसेच महाराष्ट्र पाटबंधारे अधिनियम, १९७६ चे नियम तयार करणे शासनाच्या विचाराधीन होते. त्या अनुषंगाने खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| १. | श्री. अ. वा. सुर्वे, | मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे | अध्यक्ष |
| २. | श्री. सं. दे. कुलकर्णी | अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे | सदस्य |
| ३. | श्री. अ. अ. कपोले | अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे | सदस्य |
| ४. | श्री. अ. अ. दाभाडे | अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, सोलापूर | सदस्य |
| ५. | श्री. म. कि. पोकळे | अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नाशिक | सदस्य |
| ६. | श्री.एस.एस. आपटे | कार्यकारी अभियंता, ल.पा.विभाग क्र.२, चिखली | सदस्य |
| ७. | श्री. जी.व्ही. व्यवहारे | सेवानिवृत्त कार्यकारी अभियंता, औरंगाबाद | सदस्य |
| ८. | डॉ. एस. जी. भोगले | सेवानिवृत्त प्राध्यापक, वाल्मी | सदस्य |
| ९. | श्री. ए.आर. सुर्यवंशी, | , सेवानिवृत्त प्राध्यापक, वाल्मी | सदस्य |
| १०. | श्री. कि. ए. वरंबे | सेवानिवृत्त कार्यकारी अभियंता, नागपूर | सदस्य |
| ११. | श्री. रा.श्री. सोनटक्के | अधीक्षक अभियंता व सहसंचालक, वाल्मी, औरंगाबाद. | सदस्य सचिव |

**समितीची कार्यकक्षा :**

१) महासंचालक, वाल्मी यांनी नियुक्त केलेल्या देवकर समितीचा प्रारुप अहवाल विचारात घेऊन तसेच महाराष्ट्र पाटबंधारे अधिनियम १९७६ व त्या अनुषंगाने इतर कायदे व महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण २००५ व MMISF कायदा २००५ व त्याचे नियम २००६ या मधील तरतूद विचारात घेऊन महाराष्ट्र पाटबंधारे अधिनियम, १९७६ मध्ये सुधारणा करणे.

२) महाराष्ट्र पाटबंधारे कायद्याचे प्रस्तावित नियम (Rules) करणे.

**समितीचा कार्यकाळ :**

१. महाराष्ट्र पाटबंधारे अधिनियम **१९७६** मध्ये सुधारणा करणे- कालावधी २ महिने

२. महाराष्ट्र पाटबंधारे कायद्याचे नियम (Rules) करणे - कालावधी **६** महिने

३. सदरहू समिती आपला अहवाल **३०** जुन, **२०१५** पर्यंत शासनास सादर करील.

समितीच्या सदस्यांनी आपला कार्यरत पदाचा कार्यभार सांभाळून उपरोक्त कार्यवाही पार पाडावी. सेवानिवृत्त/ अशासकीय सदस्यांच्या मानधनाबाबत महासंचालक, वाल्मी यांनी यथोचित निर्णय घेऊन समितीचा खर्च वाल्मीने उपलब्ध अनुदानातून करावा. समितीचे कामकाज संपल्यानंतर ही समिती आपोआप संपुष्टात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२०५१५०१५८४६२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Samadhan Kondiba Sabbinwar

Digitally signed by Samadhan Kondiba Sabbinwar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Superintendent Engineer And Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Samadhan Kondiba Sabbinwar
Date: 2014.12.06 14:32:54 +05'30'

**( स. को. सब्बीनवार )**
शासनाचे उप सचिव

प्रत,

१. प्रधान सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई .
२. सचिव, लाक्षेवि, जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई
३. महासंचालक, वाल्मी, औरंगाबाद
४. सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई
५. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद
६. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे
७. कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर
८. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, औरंगाबाद
९. मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, लाक्षेविप्रा, औरंगाबाद
१०.मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, उत्तर महाराष्ट्र प्रदेश,नाशिक
११.मुख्य अभियंता, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, औरंगाबाद
१२.मुख्य अभियंता (पाटबंधारे) व सह सचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
१३.अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाक्षेविप्रा, नाशिक
१४.अधीक्षक अभियंता, लाक्षेविप्रा, औरंगाबाद
१५.उप सचिव (सिंव्य), जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई
१६.अवर सचिव (सिंव्य/धोरण), जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई.
१७.सर्व संबंधित सदस्यांना.
१८. सिंव्य(धोरण) संग्रहार्थ